इत्यर्थ
एप्रिल २०१४

संपादक:
सृजा (औरंगाबाद)



.

संपर्क: ई-साहित्य प्रतिष्ठान
जी-११०२, अकरावा मजला,
ईटर्निटी, तीन हात नाका,
इस्टर्न एक्स्प्रेस हायवे,
ठाणे पश्चिम. ४००६०४.
मो. ९८६९६७४८२०

वेबसाईट : www. esahity. com, etyarth. blogspot. in

ईमेल: esahity@gmail. com, etyarth. esahity@gmail. com.

# संवाद

नमस्कार रसिकहो

नुकताच गुढीपाडवा झाला. नव्या वर्षाची सुरुवात गुढीच्या मंगलमय परंपरेने आणि श्रीखंड-पुरणपोळीच्या धमाल बेताने सगळीकडे धूमधडाक्यात झाली असेल. चैत्राची पालवी नव्या चैतन्याच्या आशा आणत आहे. वसंताच्या नव्या रंगासोबतच इत्यर्थही नाविन्याचा नव्याने अंतर्भाव करत आहे

आपल्या सगळ्या रसिकांच्या प्रेमातून आणि आशीर्वादातून इत्यर्थला खूप खूप नवे लेखक मिळाले.

आणि आता आपण शोधात आहोत संपादकीय कौशल्याच्या!! काही नवे भन्नाट वेगळे विचार आणून या एकूणच ई साहित्य चळवळीला नव्या क्षितिजांपर्यंत नेण्याची धमक असणारे नवे संपादक हवे आहेत. अतिथी संपादक. तुम्ही. हो ... हो.. तुम्हीच.

इत्यर्थ येत्या संवत्सरात एक नवा उपक्रम घेऊन येत आहे. उपक्रमाचं नाव आहे, “मोहर”. या उपक्रमांतर्गत आम्ही शोधत आहोत ई-साहित्य प्रतिष्ठानच्या वाचक-लेखक वर्गातून ई-मासिकासाठी अतिथी संपादक! एका अंकापुरते संपादक.

इत्यर्थचा प्रत्येक अंक बनवणं ही एक अगदी मनापासून आनंद देणारी मजेशीर प्रक्रिया असते. या प्रक्रियेचा अनुभव आम्ही तुम्हाला एक अतिथी संपादक या नात्याने देऊ इच्छितो.

स्किलची काळजी नसावी. इत्यर्थचे निवासी विदयमान संपादक संपूर्ण प्रक्रियेत अतिथी संपादकांच्या सोबत असतील. आणि बाकी सगळी मदत करण्यासाठी ई-साहित्यची संपूर्ण टीम सुसज्ज असेल. फ़क्त तुमच्या कल्पनाशक्तीची जोड हवी आहे.

तर! मोहर बद्दल अधिक माहिती मिळवण्यासाठी किंवा सहभागी होण्यासाठी बिनधास्त मला संपर्क करा!

सर्व रसिकांना नववर्षाच्या शुभेच्छा!!

सृजा
samhita.hiswankar@gmail.com , 7588399399

# उध्वस्त इराक

सुधीर मुतालीक

२००३ सालच्या १९ मार्च रोजी भल्या पहाटे अमेरिकी विमानांनी बघदादवर आग ओकायला सुरुवात केली आणि २१ दिवसात बघदाद वर संपूर्ण ताबाही मिळवला! २००३ च्या मे महिन्यात युद्ध संपले, पुढे सात महिन्यांनी लपून बसलेला सद्दाम सापडला,३० डिसेंबर २००६ च्या सकाळी सहा वाजता सद्दामला दीडशे शियांची निर्घुण कत्तल केल्याच्या आरोपावरून फासावर लटकवलं. जल्लोष झाला, आता इराकचे प्रश्न सुटले या विषयावर जगातल्या दिग्गज नेत्यांची भाषणे झाली. १९ मार्च २०१३ रोजी म्हणजे अमेरिकेने "इराकी जनतेला मुक्त करण्यासाठी" इराकवर केलेल्या हल्ल्याला बरोबर दहा वर्षे पूर्ण झाल्याच्या दिवशी राष्ट्राध्यक्ष बराक ओबामा यांनी आपल्या लष्कराला "इराकी जनतेला मुक्त केल्याबद्दल" सलाम ठोकला. इराकी जनतेच्या आजच्या जीवनमानाचे वास्तव काय आहे ? गेल्या वर्षी नाशिक मध्ये माझ्या ऑफिसमध्ये आलेला आणि गेली काही वर्षे परिचित असलेला एक अत्यंत कर्तबगार उद्योजक "मी आणि माझ्या कुटुंबीयांना इराकमध्ये परमेश्वराने जन्माला घालण्याऐवजी अन्य कोणत्याही देशात कुत्र्याचा जन्म दिला असता तरी चालले असते" असे धक्कादायक आणि काळीजाचा थरकाप उडवणारे विधान करताना अतिशय हताश झालेला मी बघितला. सात आठ वर्षापूर्वी अतिशय वैभव संपन्न आणि सुखासीन आयुष्य जगणा-या कुटुंबांतला हा इसम ”रोज सकाळी उठल्यावर आणि परमेश्वराच्या कृपेने उठलो तर आज झोपे पर्यंत दिवसभर सुरक्षित जगायचे एवढेच आम्ही कुटुंबीय ठरवू शकतो. अमेरिकेला आम्हाला मुक्त करायचे होते. २००३ सालच्या आधी आम्ही मुक्त नसू कदाचित पण सुरक्षित नक्की होतो. आता मुक्त झालो की नाही माहिती नाही पण आम्ही सुरक्षित नक्की नाही!" अमेरिकेने २००३ साली इराकमध्ये घुसखोरी केल्या नंतर इराक गेल्या दहा वर्षांत संपूर्ण उध्वस्त झालंय. या विधानात सर्वात महत्वाची बाब अशी आहे की इराक युद्धामुळे उध्वस्त झालेलं नाही. इराक, युद्धानंतर अमेरिकेने आपल्या ताब्यात ठेवल्यानंतर बेचिराख झालंय.

जवळ जवळ सदतीस हजार इराकी जनता तुरुंगात डांबली गेली आहे ज्यांच्यावर काय आरोप आहे हे कुणाला माहिती नाही किंवा कित्येक जणांवर काहीच आरोप नाही. अबू घरिब इथला तुरुंग तर छळ छावणी आहे. इथल्या बंदिवानांवर कुत्री सोडणे, बेदम मारहाण, विवस्त्र अवस्थेत ठेवणे, लैंगिक अत्याचार असे प्रकार नियमित होत आहेत.

अबु घरिब मधली थरकाप उडवणारी छायाचित्रे संपूर्ण जगाने पाहिल्यावर जी खळबळ उडाली ती बघून अमेरिकेचे तत्कालीन संरक्षण सचिव डोनाल्ड रम्सफिल्ड यांनी अमेरिकी काँग्रेस समोर झालेले अत्याचार मान्य केले होते आणि आवश्यक ते बदल इराक मध्ये करू अशी ग्वाही दिली होती. अर्थात त्याचा वास्तवावर आजतागायत फरक पडला नाही आणि अत्याचार सुरूच आहेत - अमेरिकेचे लष्कर तिथून निघाले असले तरी. या ग्वाही नंतर बंदिवानांच्या तोंडात प्लास्टिकचा पाईप आत मध्ये खोचून मारहीण असे नवीन प्रकारच्या तक्रारी अम्नेस्टी इंटरनॅशनलने आपल्या अहवालात प्रसिद्ध केल्या आहेत. या समारे सदतीस हजार बंदिवानांपैकी अर्ध्या महिला आहेत आणि त्यांची परिस्थिती आणखी भीषण आहे. हे बंदिवान आहेत कोण? त्यांचा गुन्हा काय असतो? चोर, डाकू , देशद्रोही , अतिरेकी? नाही. सबाह हसन हुसेन नावाची एकेचाळीस वर्षांची महिला पत्रकार आपल्या नातेवाईकाची चोरीला गेलेली गाडी परत आणण्यासाठी गेली असता तिला २९ फेब्रुवारी २०१२ रोजी अटक झाली. तिची रवानगी तीक्रीतच्या तुरुगात केली. सबाहची २३ जानेवारी २०१३ रोजी निर्दोष मुक्तता झाली पण तरीही तिला २८ फेब्रुवारी २०१३ पर्यंत तुरुगात ठेवले होते. सबाह बाहेर आली ती संपूर्ण उध्वस्त होऊन. तिच्या शरीरभर सिगरेटचे चटके होते. प्रचंड मारहाणीच्या खुणा शरिरभर होत्या. तिला विवस्त्र करून पुरुष पोलिसांसमोर उभे केले जायचे. बर्फाच्या पाण्याचा मारा तिच्यावर व्हायचा.

इराकबरोबरचे युद्ध सुरु झाल्यापासून एका महिन्याच्या आतच खरेतर संपले होते. पण युद्ध संपल्यानंतरचा नरसंहार अभ्यासला तर एक देश पूर्णपणे उध्वस्त करण्याच्या प्रयत्नांच्या खुणा नक्की सापडतील. बहुदा इराकच्या मध्यम वर्गाला जो शिक्षित आहे, बुद्धिवादी आहे आणि व्यावसाईक आहे अशा पूर्ण वर्गाला नेस्तनाबूत करण्याचे वेगवेगळे प्रकार इराक मध्ये आजही चालू आहेत हे दिसते. विशेषत:शिक्षण क्षेत्रात आणी वेगवेगळ्या विद्यापीठांशी संबंधित काम करणा-या मध्यम वर्गीयांना उध्वस्त करणारी आकडेवारी अंगावर शहरा आणणारी आहे. हत्या करण्यात आलेल्यात ५०% प्राध्यापक आहेत, १२% डीन आहेत, २% कुलगुरू वा उपकुलगुरू आहेत, ६% अन्यान्य विभाग प्रमुख, ६% सह प्राध्यापक आणि १३% शिक्षण क्षेत्राशी संबंधित बुद्धिवंत आहेत. शिक्षण क्षेत्रच मोडकळीला आणण्याचा एक कट दिसतो. २००३ सालच्या आधी इराक मधली १००% मुलं शाळेत जायची युद्ध संपल्यावर तीन वर्षे उलटून गेल्यावर म्हणजे २००६ साला पासून पस्तीस लाख मुलांपैकी खच्चून ३०% मुलं प्राथमिक शाळेत जातात. सतरा वर्षांवरील सुमारे २५% युवा विद्यार्थी परीक्षा देऊ शकले. २००३ सालानंतर सुमारे ७०० प्राथमिक शाळा बॉम्ब फेक करून उध्वस्त केल्या गेल्यात, २७०० शाळा मोडकळीस आलेल्या आहेत, ७४% शाळांमध्ये पिण्याचे पाणी आणि स्वच्छतागृहांची सोय आजही नाही.

इराकची आजची एकूणच आरोग्य व्यवस्था भयानक आहे. नोंदणीकृत सुमारे १८ हजार डॉक्टरां पैकी सुमारे २५% डॉक्टर गेल्या दहा वर्षात इराक सोडून निघुन गेले. उर्वरित पैकी २५० डॉक्टरांना पळवून नेण्यात आले आहे आणि त्यांचा आजतागायत पत्ता नाही. अल जझीराचा जगप्रसिद्ध पत्रकार दहेर जमाईल याने इराकचा प्रवास करून आल्यावर १५ मार्च २०१३ मध्ये प्रसिद्ध केलेल्या अहवालात प्रत्यक्षात युद्ध संपले असले तरी युद्धाने इराकला तहहयात रुद्र तांडव करणा-या अनेक जीवघेण्या बाबींचा शाप दिला आहे असे म्हटले आहे. कॅन्सर हा एक अत्यंत खतरनाक शाप. युद्धात प्रचंड मोठ्या प्रमाणात विषारी अस्त्रे वापरली गेली त्यातही मुख्यत: डीप्लीटेड युरेनियम आणि व्हाईट फॉस्फरस हे अत्यंत विषारी आणि दूरगामी परिणाम करणारे पदार्थ वापरले गेले. त्यांचा परिणाम हिरोशिमा आणि नागासाकी पेक्षा कितीतरी भयानक आहे. इराकच्या फ़ल्लुजह भागात झालेले आणि होणारे जनुकीय नुकसान हे आजवर मानवी जीवनात झालेले सगळ्यात जास्त नुकसान आहे. मिशिगन विद्यापीठात संशोधन करणा-या डॉ मोहघन बाईंचे म्हणणे आहे की बॉम्बिंग आणि गोळीबाराचा अति वापर झालाय इराक मध्ये त्यामुळे पारा, युरेनियम आणि शिसे या विषारी धातूंचा प्रचंड फैलाव बसरा आणि फ़ल्लुजह झालाय. पण लोक पुन्हा त्याच भागात आपले बस्तान बसवायचा प्रयत्न करत आहेत. आज या भागात कॅन्सरचे प्रमाण चाळीस पटीने वाढलंय. महिलांमध्ये प्रचंड गर्भपाताचे प्रमाण वाढलंय. शारीरिक विकृती असलेली संतती जन्माला येण्याचे प्रमाण मोठया प्रमाणात वाढलंय. या भागात सहाशे करोड विषारी गोळीबारूद ओतले गेले आहे !

गेल्या दहा वर्षात पंधरा लाख इराकी जनता मारली गेली. त्यात सुमारे निम्म्या स्त्रिया आणि जवळ जवळ पाच लाख लहान मुले मारली गेली. इराक मध्ये सुस्थितीत जगणा-या कुटुंबाना रेशनचे धान्य मिळवण्यासाठी आज मारामारी करावी लागते. प्रत्यक्ष हल्ल्याच्या आधी पंधरा दिवस ६ मार्च २००३ रोजी बुश साहेबांनी मोठी आरोळी ठोकली होती की इराकी जनतेच्या अन्नपाण्याची आणि औषधाची जबाबदारी अमेरिकेची असेल, आम्ही त्यांना सर्वकाही पुरवु. पण प्रत्यक्षात पिण्याचे शुद्ध पाणी, वीज आणि मलनिस्सारण व्यवस्था या बाबी इराण मध्ये आज स्वप्नवत आहेत. नोकरी करणा-यां पेक्षा नोकरी नसलेली जनता जास्त आहे. एके काळी बघदादच्या रस्त्यावरून स्वत:च्या गाडीतून फिरणा-या महिलेचे उर्वरीत सगळे कुटुंब आणि मालमत्ता उध्वस्त झाल्यामुळे जगण्याचे साधन म्हणून तिला वेशा व्यवसाय करावा लागतो.

महिलांना घरात सुद्धा सुरक्षित रहाता येत नाही. आधी आम्ही फक्त सद्दामचा मुलगा उदयला घाबरायचो. आज प्रत्येकाची भीती वाटते असे तिथल्या महिलांचे म्हणणे आहे. घटस्फोट आणि बाल विवाहांचे प्रमाण प्रचंड वाढलंय. इराक आज विधवांचा आणि घटस्फोटीतांचा देश आहे.एकूण महिलांच्या दहा टक्के महिला युद्धामुळे झालेल्या विधवा आहेत. एसटी बस सारख्या चाके असलेल्या घरामध्ये या विधवांना एकत्रित कोंबून आपले दैनदिन जीवन कंठावे लागते. २००८ साली बुश साहेबांवर बुट फेकणारा पत्रकार " मी हा मारा इराकी विधवांच्या वतीने करतो आहे" असे ओरडला होता. त्या पत्र्याच्या गाडी मध्ये राहणारी नोरीया खलफ़ म्हणते "मला काही ही करून लग्न करायचे आहे. मला नवरा हवा आहे आणि माझ्या मुलाला बाप !"

"...लोकशाही संपूर्ण भोगताना माझ्या भारतीय मित्र मैत्रिणींना आपण सतत अन्यायग्रस्त आहोत असे का वाटते...? "

- sudhirmutalik@gmail.com

# वेळु ग्राम

किशोर मधुकर काकडे

"माझा गाव "

माझ गाव बेळगाव। याला पूर्वी "वेळु ग्राम" किंवा "वेणु ग्राम" म्हणायचे पण ते नंतर बेळगाव झाले आणि कर्नाटक सरकारनी त्याच नामकरण आता "बेळगावी“ अस केलय आणि रेलवे STATIONS नी तर "बेलगाम" केलय. मराठी भाषा आणि बेळगावचा प्रश्न हा जूना झाला असला तरी तसाच आहे. पण दैनदिन व्यवहारात मराठी-कन्नड़ लोक अगदी गुण्या गोविन्दानी राहतात, इतकेच काय तर देशपांडे, कुळकर्णी, पाटील, जोशी, देसाई आदी आणि इतर कुटुंबात रोटी-बेटी व्यवहार अनेक पिढ़यापासून चालत आला आहे आणि त्यामुळे दोन्ही घरात-कुटुंबात अर्धी मंडळी मराठी अणि अर्धी मंडळी कन्नड़ भाषा सहजपणे बोलतात तिथे भाषेचा प्रश्न कधीच उद्भवत नाही अनेक मराठी चित्रपट -नाटके याना दोन्ही मंडळी गर्दी करतात. पण महाराष्ट्रानी आणि महाराष्ट्राच्या मराठी वाहिन्यानी बेळगावकड़े आणि इथल्या मराठी आणि कन्नड़ असूनही मराठी जाणणारयाच्याकडे दुर्लक्ष केलय. REALITY SHOWS ची ऑडिशन्स ,HOME मिनिस्टर आणि इतर कार्यक्रम बेळगावात का नाहीं?

बेळगाव म्हणजे कुंदा-नगरी, कुंदा -पेढा-कर्दंट, रस्त्याच्या कडेला मिळणारी ताजी -ताजी हिरवी भाजी, इथला पाप-भीरु पण त्याच बरोबर लढावू माणूस साहित्य प्रेमी, सदैव सांस्कृतिक कार्यक्रमात भाग घेणारा, महाराष्ट्रात जेवढी मराठी साहित्य सम्मेलन होत नसतील त्याहीपेक्षा अधिक मराठी सम्मेलने इथल्या परिसरात होतात आणि महाराष्ट्र आणि बृहनमहाराष्ट्रातील थोर साहित्यिक इथे येवून मार्गदर्शन करतात अणि कौतुक करतात. इथे जसे महात्मा गांधी येवून गेले तसेच स्वामी विवेकानन्द ही वास्तव्य करुन गेले. बेळगावचा भुई कोट किल्ला तिथली कमल जैन बस्ती ही विशेष. सीमाप्रश्नाच्या आंदोलनात स्वर्गीय बाळासाहेब ठाकरे पासून बै. नाथ पै, मधु दण्डवते, शरद पवार सारखी दिग्गज मंडळी येवून गेलित अणि आजही येत असतात. कर्नाटक सरकार तर आता आपलं एक अधिवेशन इथल्या करोडो रुपये खर्चून बांधलेल्या नव्या विधान भवनात घेत असते.

बेळगावच रेलवे STATION आणि एअरपोर्ट पुरातन किंवा खूप आधीच गोवा जवळच असल्याने गोव्याची मंडळी बेळगावत सतत येत असतात. बेळगावचा अलिपाक व त्याबरोबर उसाचा ताजा रस म्हणजे लाजवाब. बेळगावकर इथल्या थंड हवामानामुळे चहा प्रिय म्हणूनच इथे कुणाच्याही घरी चहानी जरुर स्वागत होतं. सार्वजनिक श्री गणेश उत्सव आणि श्री शिवजयंती महाराष्ट्राला तोड़िस -तोड़ अशीच होते. तिळगुळ घ्या गोड बोला तर सोनं घ्या सोन्यासारखं रहा असे सारे सण अगदी नागपंचमी, दिवाळी, लक्ष्मी पूजा बघण्यासारखे आजही इथला माणुस जरी मॉल्स, MULTIPLEXES आली असली तरी पायजामा -नहरू शर्ट, CYCLE पसंद करतो. इथली मराठी भाषा आणि त्याचबरोबर कन्नड आणि उर्दू मिश्रीत हिंदी भाषा म्हणजे बेळगावा बाहेर सदैव टवाळीचा विषय पण तरीही या सर्व भाषा इथल्या जागेच वैशिष्ठ्यच आहेत. RETIREMENT नंतर थंड हवेच्या ठिकाणी ताजी हिरवीगार भाजी आणि लुसलुशित मटण खात रहायचं आहे तर बेळगाव मस्तच, मी बेळगावकर आम्ही बेळगावकर तुमच स्वागत करतो मग आम्ही महाराष्ट्रात जावू वा न जावू। ........................

किशोर मधुकर काकडे
एक बेळगावकर 1955 पासून
kishoremkakademangalurkar@gmail.com

# प्रचितगडावरची 'स्वारी'

किरण जोशी

दहावीची परीक्षा संपली आणि एकदाचे दहा वर्षांचे टेंशन गेले म्हणत (घरच्यांनी) सुटकेचा निःश्वास टाकला. आम्ही मात्र, परीक्षेच्या अभ्यासाचे नियोजन जितके केले नाही तेवढे सुटीतल्या ट्रेकिंगचे नियोजन करत होतो. सांगलीत प्रसिद्ध गणपती मंदिराच्या नजीकच आमचा पुराणिक वाडा.. आता वाडा म्हटल्यावर आपसुखच भलामोठा दरवाजा, शेणाने सारवलेल्या प्रचंड खोल्या, पडवीत हालणारा झोपाळा.. टिपीकल वाड्याचे चित्र तरळले असेल. पण, आमचा हा वाडा असा टिपीकल नव्हता खरा. पण, एकमेकांची नाळ जुळलेली कुटुंब या ठिकाणी गुण्यागोविंदाने राहत. वडिलधारी माणसं, दादा-ताई म्हणाव्यात अशा कॉलेजिअन्सचा (धगुरड्यांचा) ग्रुप आणि आम्हा छोट्यांची गॅंग.. असे आम्ही आपापल्या नादात मग्शुल असायचो. आम्हा पोरांचं बालपण गणपती मंदिरातील प्रसन्न आणि झाडाझुडपांनी बहरलेल्या आल्हाददायक वातारणात गेलं.

धगुरड्यांचा ग्रुप सातत्याने भटकत असायचा. त्यांना ट्रेकिंगची फार हौस. आठ-पंधरा दिवस जंगलात भटकंती करून काळवंडून परतलेल्या त्या ग्रुपची येताच 'कॅसेट' सुरू व्हायची. जंगलात कसे थ्रिलींग अनुभव येतात. वाघ, सापासारखे जंगली प्राणी 'लाइव्ह' पाहायला मिळतात याचे वर्णन ऐकताना आताच उठावं आणि जंगलात जावं असं वाटायचं.. पण, त्यांच्यामुळेच आम्हाला इतरत्र भटकण्यापेक्षा ट्रेकिंगला जाण्याचा नाद जडला. असो..

दहावीची परीक्षा संपली आणि ट्रेकिंगला जाण्याचं आमचं खूळ जागं झालं. खरंतर मोन्या (सुनील पुराणिक) शिली (शैलजा भोसले) तुपी (तृप्ती जोशी) संत्या (संतोष पुराणिक) संत्या नंबर-2 (संतोष जोशी) कोल्हापूरचा संज्या (संजय) शिल्पा आदी मोठ्यांनी आम्हाला गृहीतच धरलं नव्हतं आणि उगीचच आमची उठाठेव सुरू होती. त्यांनी वासोट्याला जाण्याच निश्चित केलं होतं पण, त्यानंतर प्लॅन बदलला आणि 'प्रचितगड' येथे जाण्याचं निश्चित झालं. इतिहास आवडीचा विषय असल्याने आम्हालाही ही कल्पना पसंत पडली. पुस्तकात गडकोट किल्ल्यांची चित्रे आणि शिवाजी महाराजांनी गाजवलेला काळ वाचताना स्फुरण चढायचं. प्रचितगडाचं नाव कुठ ऐकलं नव्हत पण, किल्ल्यावर भटकंती करायची म्हटल्यावरच (नंतर फाटणार आहे याची कल्पना नव्हती म्हणून) आम्ही आनंदीत झालो.

खरं तर मोठ्यांच्या चर्चेत आम्हाला सहभागी करून घेतलं जात असे पण, आम्हाला जमेत धरलं जात नाहीय हे लक्षात आल्यावर आम्ही 'दगा' सुरू केला. खरंतर जंगलात जाण्याची 'रिस्क' असल्याने आणि घरच्यांचा विरोध असल्याने ते आम्हाला टाळत होते. पण, रडून-फुगून घरच्यांची संमती घेतल्यावर त्यांनी (नाईलाजाने) आम्हाला स्वीकारले. माझ्यासह सँडी (संदीप) केद्या (केदार) सुरज्या (सुरज सारडा) पशा (प्रसाद) आदींनी ट्रेकिंगला जाण्याची तयारी सुरू केली.

अखेर जाण्याचा दिवस उजाडला... मिरजेतून नायरीला थेट गाडी असल्याने जागा मिळवण्यासाठी आम्ही 10 किलोमीटरवरचं मिरज गाठलं. टीशर्ट-बेरमुडा, पायात बूट, टोपी, हातात काठी आणि पाठीवर मोठ्या सॅग लादलेल्या अवस्थेत आमची मिरजेतील 'एंट्री' लक्षवेधी ठरली. शिवाजी महाराजांच्या जमान्यातील आम्ही मावळे कुठंतरी लढाई जिंकण्यासाठी जात असल्याचे उगाचच वाटू लागलं. सकाळी 11 वाजता नायरी गाडी आली आणि कोंबड्या भरल्यासारखी गाडी प्रवाशांनी भरू लागली. प्रवाशी आत चढल्यावर आमची शस्त्र गळाली. खिडक्यांतून काठ्या, गाठोडी, स्टोव्ह आत टाकून जागा 'रिझर्व' केली. आत गेल्यावर जागा मिळाली नाहीच. परंतु, आमच्या वस्तू शोधण्याची वेळ आली. काही तास उभारल्यानंतर बूड टेकण्याइतकी जागा मिळाली.

दुपार लोटली आणि आम्ही कोकणात दाखल झालो. उन्हं उतरली, सायंकाळचं गार वारं सुखावू लागलं. पण, अंग अवघडलं असल्याने कधी एकदा खाली उतरतोय असं झालं होतं. संगमेश्वरात गरगमगरम चहा आणि भजी खाल्ल्यावर जिवात जीव आला. दिवेलागणीची वेळ झाली तरी प्रचितगड काय साधा डोंगर दिसेना. गाडी जशजशी पुढं जाईल तशी गर्दी कमी होत होती. आम्हाला हलकी डुलकी लागली होती. शेवटचा थांबा नायरी होता पण, आम्हाला शृंगारपुरला जायचं असल्याने 20 ते 30 किलोमीटर अलीकडे शृंगारपूर फाट्यावर ड्रायव्हरने ब्रेक मारला तसे आम्ही खडबडून जागे झालो. रात्रीचे आठ-साडेआठ वाजले होते आणि त्या 'एसटी'त प्रवाशी म्हणून फक्त आमचा ग्रुप होता. आमची उतरण्याची लगबग सुरू झाली तेवढ्यात कंडक्टर आला आणि म्हणाला ' तुम्हाला शृंगारपुरला जायचे असेल तर आता नायरीला चला आणि सकाळी उठून परत याच गाडीतून या. कारण, या फाट्यावरून शृंगारपुरला जाण्यासाठी घाटातूनच 13 किलोमीटरची पायवाट आहे आणि येथे दोन नरभक्षक वाघ आहेत. वाघ.. म्हटल्यावर भीतीने थरकाप उडाला. बाहेर अंधार आणि किर्र झाडी पाहिल्यावर मी तर गाडी न सोडण्याचे ठरवले. मोठ्या मुलांची चर्चा सुरू झाली आणि त्यांनी गाडी सोडण्याचा निर्णय घेतला. आत रहाण्यास नकार दिला तर शिव्या खाण्याबरोबरच 'भित्रा' म्हणून घ्यावं लागलं असतं, म्हणून मीही निमूटपणे खाली उतरलो.सुरुवातीलाच चढण सुरू झाली पण, आजूबाजूला दाट झाडी होती. या झाडीतून पायवाट गेलेली होती. अधूनमधून गोंधळात टाकणारे फाटे फुटायचे. कोणी भरकटले तर पंचाईत होणार होती म्हणून हा धोका टाळण्यासाठी रामचंद्रराव यांनी सुरुवातीस सर्वांना 'जंगली' भाषा शिकवली. 'जंगली' म्हणजे धोका असल्यास विशिष्ट प्रकारची आरोळी द्यायची.

अशा चार ते पाच प्रकारच्या आरोळ्या त्यांनी शिकवल्याच नाहीत तर चांगली तालीम करून घेलती. सुमारे दोन तास चालल्यानंतर डोंगराचा सपाट भाग लागला. येथे दुतर्फा उंचउंच वाळलेले गवत होते. येथून चालत असताना आम्ही दंगा-मस्ती करत होतो. पण, रामचंद्ररावांनी आम्हाला सावध केले. या ठिकाणी पदोपदी धोका होता. कारण या भागात रानडुकरांची संख्या जास्त असल्याने त्यांना पकडण्यासाठी शिका-यांनी चाप (पिंजरा) लावले होते. हा चाप धारधार असल्याने यामध्ये अडकल्यास जीव जातो. शिवाय काही चापांमध्ये दारू भरून ठेवण्यात आल्याने स्फोटही होतो. ही माहिती ऐकतात आम्ही सतर्क झालो आणि प्रत्येक पाऊल जपून टाकू लागलो. त्यांच्या सांगण्याप्रमाणे ठिकठिकाणी लावलेले चाप आम्हाला दिसून आले.

ही गडाची पहिली पायरी, वरती दुसरी पायरी असे काहीसे रामचंद्रराव सांगत होते. मात्र, तेव्हा आम्हाला याबद्दल काहीच इंटरेस्ट नव्हता. पुढे घंटाभर चालल्यावर झाडे विरळ होत गेली आणि पुन्हा कठीण जढण आली. दोन्ही बाजुला वाळलेल्या काट्यांकुट्यांचा आधार होता. पण, तोही पुढेपुढे कमी होत गेले. चढण वाढत गेली तसे पाय घसरू लागले अचानक आमच्यासमोर असे चित्र उभे राहिले की काळजात एकदम धस्स झाले. दोन्ही बाजूला खोल दरी आणि त्यामधून एक वळण घेत पायवाट पुढे गेली होती. तेव्हा आम्ही 25 टक्केच गड चढलो हे नंतर कळले. आमच्या समोर केवळ दगड आणि कपा-यांतून गेलेली ती पायवाट पाहिल्यावर तर मी पळ काढायचेच निश्चित केले होते. पण, सुमारे तीन ते चार तासांचे आणि तेही दाट जंगलातून आम्ही येथपर्यंत आलो होतो त्यामुळे मागे वळण्याची कल्पनाही मुर्खपणाची होती. पण, पुढे जाणेही शक्य नव्हते. आमची तोंडे बघितल्यावर रामचंद्ररावांना आम्ही घाबरल्याचे जाणवले. 'एवढे वळण झाले की झाले' पुढे घाबरण्याचे काही नाही' असे सांगत त्यांनी धीर देण्याचा प्रवत्न केला. मी तर खाली बसकण मारून एका दगडाला मिठी मारली होती. पायाला कंप फुटला होता. आमच्या चेह-यावरील भाव पाहून मोठ्यांनी 'म्हणून तुम्हाला येऊ नका म्हणत होतो..' अशी झाडमेपट्टी सुरू केली. आता झक मारत पुढे जावे लागणार याची जाणीव झाली. दगडाच्या आधारेच उठतो तोवरच खोल दरी आ.. करून आमचा घास घेण्यासाठी आसुसली असल्याचा भास झाला. (खरंतर यावेळीच ट्रेकिंगची खाज भागली होती पण, पुढे खूप काही वाढून ठेवले होते)

सुरुवातीला मोन्या आणि रामचंद्रराव पुढे सरसावले. केवळ पाऊण ते एक फुटाची पायवाट, एका बाजुला दगडी कपार आणि दुस-या बाजुला दरी (डोळ्यांसमोर चित्र उभे राहिले आणि हे लिहितानाही हात थरथरत आहेत) अशा काळजात धस्स करणा-या पायवाटेवरून भाजीमंडईतून फिरत असल्यासारखे रामचद्रराव बिनधास्त चालत परतले. आम्ही पुढे जाणार तोवर जोरदार वारे सुरू झाले आणि दरीतून घूं... घूं.. आवाज सुरू झाला. तोंडातून राम.. राम.. राम.. राम.. असे पुटपुटत आम्ही पुढे सरसावलो. 25-30 पावले चालल्यावर आता मागे वळून पाहण्याचीही सोय नव्हती.

एक वळसा घालून अशा ठिकाणी येऊन पोहोचलो की, ज्याची आम्ही कल्पनाही केली नव्हती. आता तर चक्कीत चांगलाच जीळ झाला होता. फॉल्स पॉइंट वरून आपण दरीत कोसणारे धबधबे बघताना आपण बेधुंद होऊन जातो. आता मला सांगा या धबधब्याचे वरचे टोक आणि खालचे टोक याच्याबरोबर मध्ये तुम्हाला नेऊन सोडले तर काय मजा येईल ना. कल्पना केल्यावरच फाटली ना... हो अशीच अवस्था आमची झाली. कारण, कोरड्या पडलेल्या धबधब्यांच्या मधोमध आम्ही येऊन पोहोचलो. आता पुढे जाण्यासाठी येथून वर चढाई करावी लागणार होती. आमच्याकडे दोर वगैरे काहीच नव्हते. आता मात्र, आम्ही संतापलो. मागे दरी आणि वरची चढाई बघून मोठ्यांचीही फॅ.. फॅ.. झाल्याचे जाणवत होते. सारेच फसलो होतो. पावसाळ्यात हा मार्ग बंद असतो. आणि त्यावेळच्या उन्हाळ्यात या मार्गावरून जाणारे आम्ही पहिलेच ट्रेकर्स होतो असे सांगताना रामचंद्रावही गोंधळल्याचे जाणवत होते. तसे कारणही होते. त्या चढाईवरची नेहमीची दुरड कोसळल्याने ही चढण धोकादायक बनली होती. त्या दगडांना हलका हात लागला तरी वरून माती आणि दगडगोटे घरंगळत खाली येऊन थेट दरीत कोसळत होते. आता आली का पंचाईत. (हीच दुसरी पायुरी होती) हार मानणार तो कोकणी माणूस कसला? रामचंद्रराव यांनी कमरेला गुंडाळलेला आणि मानेचा टॉवेल काढला. आमच्याकडून टॉवेल मागून घेतले आणि एकाला एक गाठी मारत त्यांनी 'दोर' बनविला. 'काय व्हायने नाय हो.. ' असे म्हणत दिलीसा देत ते दोर घेऊन दगडांचा आधार घेत भराभर वरती चढले. खाली दगड पडत असल्याने 'सांभाळा.. साभाळा.. ' अशा सूचना ते सातत्याने देत होते. मध्येच थांबून घाम पुसत त्यांनी उसासा घेतला आणि बघताबघता टोक गाठले. एकावर एक करत आमचे 'शर' सवंगडी सरसावले खरे पण, त्याठिकाणी केवळ पाय टेकण्याइतकीच जागा होती. येथून डाव्याबाजूस दरी सुरू होत होती. मी आणि सुरज्याने एकमेकांना धीर देत कसेबसे चढण पार केले पण, वर जाताच समोर दरी पाहून डोळेच फिरले. खोल दरी आपली पाठ सोडणार नाही याची मनाशी खूणगाठ बांधल्याने भीती काहीशी मोडली होती. एक फुटाच्या पायवाटेवरून चालत असताना डाव्या बाजूस न बघता आम्ही पुढे सरकत होतो.

आमच्या ग्रूपमध्ये फूट पडली होती. पुढे गेलेले काहीजण एका भल्यामोठ्या दगडावरून कशाचाही आधार न घेता पुढे जाण्याचा प्रयत्न करत होते. दोन्ही बाजूस दरी होतीच शिवाय तापते ऊन आणि जोराच्या वा-यामुळे समस्या वाढत होत्या. अधून-मधून पायवाटच ढासळल्याने तीन ते चार फुटांवर उडी घेण्याचे धाडस करावे लागत होते. विश्रांती घेण्याची इच्छा असली तरी थांबायला जागाच नव्हती. समारे अडीजतास चालल्यानंतर भगवा झेंडा दिसू लागला. गडावर पोहोचल्याच्या जाणीवेने थोडा दिलासा मिळणार तोवर नवे संकट उभे राहिले.

गडावर पोहोचण्यासाठी एका डोंगरावरून गडावर एका लोखंडी शिडीवरून जावे लागणार होते. पण, ही केवळ नावाची शिडी होती. एक लोखंडी पाइप दोन्हीकडून मातीत खुपसण्यात आली आहे. आणि कोणताही आधार नसणा-या पाय-यांवर पाऊल टाकताच या पाया-या स्वतः भोवतीच फिरायच्या. (आता गडावर वेल्डींग कोठून येणार) आता मात्र, खरंच धाडस करायचे होते. आपली काय गय नाही आणि येथून आपण परत जिवंत परत जीऊ शकत नाही, असे वाटू लागले. खालच्या दरीकडे लक्ष न देता आम्ही गडावर कसे पोहोचलो ते देवच जाणे. वरती गेल्यावर फिरण्या आणि बघण्यासारखे बरेच काही होते मात्र, आता कुणाच्याही अंगात जीव नव्हता. पाण्यासाठी आम्ही विहिरीकडे धावलो तेथील गोड पाण्याने भागलेली तृष्णा आजही समाधान पावते. पण, एकवेळा तेथे मोठे काळे अजगर पाहिले आणि पुन्हा तथे जाण्याची कोणाचीही छाती झाली नाही. गडावर भग्नावस्थेत असलेल्या देवीच्या मंदिराचे आम्ही दर्शन घेतले. काट्याकुट्या गोळा करून स्टोव्हवर खिचडी शिजवली आणि रात्रीचे 'जेवण' करून आम्ही झोपी गेलो.

दुस-या दिवशी सकाळी गारठ्याने हडहडी भरली आणि आम्ही जागे झालो. अंग कण्हत होते. प्रत्येकाच्या मनात गड पाहण्याच्या कुतूहलापेक्षा 'आता खाली उतरायचे' या जाणीवेनेचे भीती संचारली होती. येथून घेऊन जाण्यासाठी एखादे विमानेे आले तर किती बरे होईल अशा पोरकट कल्पना मनात घोळू लागल्या. मला तर खाली उतरण्यापेक्षा खाली उडीच टाकावी असे वाटायचे. बोलाचालीत सगळ्यांनीच आपली भीती व्यक्त करीत आलेल्या मार्गावरून उतण्यास नकार दिला. रामचंद्ररावांकडे दुस-या मार्गाबाबत विचारले तर ते म्हणाले जाता येईल पण, दोन-तीन दिवस जंगलातून जावे लागेल. आम्ही लगेचच तयारी दाखवली आणि परतीचा प्रवास सुरू झाला. त्या शिडीवरून खाली उतरायचे 'जीवा'वर आले होते. कसेबसे आम्ही खाली आलो आणि डाव्या हाताच्या पायवाटेने जंगलात घुसलो. दाट झाडीतून डोंगर चढायचे आणि उतरायचे. असे करत करत आम्ही घनदाट जंगलात दाखल झालो. असे टिपीकल जंगल मी कधीच पाहिले नव्हते. जागोजागी जनावरांच्या विष्ठेचा वास येत होता. एके ठिकाणी तर पालापाचोळ्यात पाय गेल्यावर आम्ही कमरेइतक्या खड्यात गेलो. त्यातून हिरवे साप बाहेर पडू लागले. मोठमोठ्याने किंचाळत बाहेर पडतो तोच माकडांची टोळी कोठून दाखल झाली कुणास ठाऊक. या टोळीने आमच्यावर हल्ला चढविला. या रानटी माकडांकडूनही धोका असल्याचे लक्षात येताच आम्ही पळ काढला. दुपारचे दोन वाजले असतील पाणी संपत होते आणि आम्ही कमालीचे थकलो होतो. पाण्याचा कोठेच ठावठिकाणा नव्हता. एकाच बाटलीत पाणी शिल्लक होते आणि त्याचा ताबा मोन्याने घेतला. जो जास्त बॅगा वागवेल त्याला एक टोपण पाणी देण्याचा निर्णय त्याने घेतला.

पायात चालण्याचा त्राण नसताना पाण्यासाठी ओझे घ्यावे लागत. अचानक आम्हाला पाण्याचे एक डबके दिसले आणि खांद्यावरील बॅगा झटकून सर्वचजण त्या पाण्याकडे धावलो. खरेतर ते डबकेही आटले होते आणि उरल्या पाण्यामध्ये जनावरांची विष्ठा तरंगत होती. मात्र, आम्हाला केवळ पाणी दिसत होते. विष्ठा दूर करून आम्ही त्या पाण्यावर ताव मारला. (खरेतर यावेळी आम्हाला पाण्याची किमत कळली) जाताना करवंदाच्या जाळ्यातील करवंदे, जांभळ आणि कच्च्या कै-यावर आम्ही ताव मारत होतो. सायंकाळी आम्ही निवळी या जंगलात मधोमध वसलेल्या गावात (लोकवस्तीत) पोहोचलो पण, येथे गेल्यावरच जे चित्र पाहिले त्यामुळे भीतीने परिसीमाच गाठली. काही वेळापूर्वीच त्याठिकाणी वाघाने हल्ला केला होता. गायीच्या बछड्याला ओढत जंगलात नेल्याच्या खुणा ताज्या होत्या. या झटापटीत वाघाने एका व्यक्तीवरही हल्ला केला होता. विशेष म्हणजे ज्या मार्गावरून त्याने बछड्याला फरफटत नेले होते त्याच मार्गावरून दुस-या दिवशी आम्हाला जायचे होते. रात्रभर गायीचा हंबरडा ऐकून आम्हालाही झोप आली नाही.

सकाळी उठल्यावर तेथील व्यक्तीने आम्हीला ताजी माडी आणून दिली. माडी म्हणजे काय हे माहीत नव्हते आणि भुकेने जीव व्याकुळ झाल्याने आम्ही तांब्यावर माडी प्यायेलो. त्यानंतर मात्र, माडीच्या धुंदीत आमची पावले झपाझप पडू लागली. थोडे पुढे गेल्यावर झरा दिसला. मनसोक्त डुंबून झाल्यावर गरमागरम खिचडी खाल्ली आणि पुढील प्रवास सुरू झाला. मात्र, हा आनंद काही काळच होता. रामचंद्रराव यांना पुढील रस्ता माहीत नसल्याने त्यांनी निवळीतून 'वाटाडे' सोबतीला घेतले. तीन-चार तास चालल्यानंतर सायंकाळ झाला आणि आम्ही रस्ता भरकटल्याचे लक्षात आले. वाटाडे जोडप्यांनाही काही सुचेना. याचवेळी गवा रेड्यांचा मोठा कळप आमच्याकडेच येत असल्याचे आम्हाला दिसले. गव्यांचे लीद आणि चिखलात रुतलेल्या त्यांच्या पायांचे ठसे पाहूनच त्यांच्या भव्यतेचा अंदाज येत होता मात्र, तेच गवे कळपाने आमच्यासमोर दिसत होते. येथील गवे पिसाळले आहेत आणि ते माणसांवर हल्ले करतात असे म्हणत वाटाड्यांनी पळ काढला' माझ्या दृष्टीने सर्व काही संपले होते. भीतीने थरकाप उडला होता. रामचंद्रराव यांनी प्रसंगावधान दाखवत आम्हाला नजीकच्या टेकडीवर नेले. सूर्य मावळत होता. प्रत्येकाच्या चेह-यावर थकवा आणि भय स्पष्ट जाणवत होते. एका कोरड्या पडलेल्या नदीच्या काठाला आम्ही विसावलो होतो. गव्यांचे भय कमी झाले पण, तेवढ्यात झुडपांचा आवाज सुरू झाला आणि त्यातून गव्याचे शिंग बाहेर आले. मुली किंचाळल्या. कोल्हापच्या संज्याने मेलेल्या गव्याच्या सडलेल्या ककालातून शिंग तोडून आणले होते. याचेठिकाणी रात्र काढण्याची निर्णय झाला आणि खाणेपिणे झाले आणि चारीबाजूंनी आग लावून आम्ही गप्पा मारत बसलो. रात्री प्राण्यांचे आवाज ऐकू येत होते.

दुस-या दिवशी आग विझली होती आणि सर्वजण गाढ झोपेत होतो. नकळत आम्ही धाडस केले होते. खांद्याला बॅगा लादून पुन्हा चालणे सुरू झाले. डोंगरावरून नागमोडी वाटांमधून न जाता शॉर्टकट म्हणून ज्या दिशेला जायचे तेथे घसरगुंडी करत जाणे सुरू केले. आमच्याकडचे खाण्याचे साहित्यही संपत आले होते. पण, हळूहळू दाट झाडी विरळ होत चालली आणि कौलारू घरे नजरेस पडू लागली. तरीही अजून खूप पायपीट करायची होती. दाट जंगलानून वरती टेकाडावर आल्यावर ज्वालामुखीचे दगडातून चालायला लागायचे. नजर जाईल तेथपर्यंत हे दगड दिसायचे त्यामुळे भरकटण्याची भीती असायची. तीन चार तास चालल्यानंतर एका उतारावरून घसरतच खाली उतरलो आणि थेट शृंगारपूरात दाखल झालो.

ट्रेकिंग म्हणून आमची हौस भागलीच पण, या तीन दिवसांनी आम्हाला जगणं शिकवलं. पाण्याचे महत्त्व कळले आणि मुख्य म्हणजे एकीचे महत्त्वंही कळले. शृंगारपूरला अलविदा म्हणताना वर नजर फिरवत 'प्रचितगड' डोळ्यात साठवून घेतला, पुन्हा इकडे न फिरकण्याची शपथ घेत.

kirantarunbharat@gmail.com

# लेक लाडकी सासरची

तृप्ती एकबोटे-देवरूखकर

मायले माय म्हणता ओठांले ओठ भिडे।
चुलतीले काकी म्हणता अंतर किती पडे॥
जिजीला जिजी म्हणता झाला जिभेला निवारा।
सासूला सासू म्हणता गेला तोंडातून वारा॥

बहिणाबाईंच्या या ओळींचं वर्णन करताना सिंधुताई सपकाळ त्यांच्या आत्मचरित्रात 'मी वनवासी'मध्ये लिहितात की, सासू-सुनांच्या नात्यामधला विस्तव ही आपल्या संस्कृतीला लागलेला शाप आहे का? याचं उत्तर वरच्या ओळींमधून बहिणाबाईंनी शोधलं आहे. पण प्रत्यक्षात मला मात्र वाटतं की, या अनोख्या नात्याच्या गुंत्याची उकल खुद्द परमेश्वराकडेही नसेल. हे नातं आहेच इतकं मजेशीर! सासू नसणा-यांना कदाचित सासूची किंमत कधीच कळणार नाही आणि सून नसणा-यांना तिच्या असण्यातली गंमत कधी लक्षात येणार नाही. खरंच, सासू-सुनेचं नातं जगावेगळंच असतं. सुरुवातीला कच्च्या कैरी इतकं आंबट असलं तरी काळाच्या मधुर पाकात मुरत जाऊन चविष्ट मोरंब्या इतकंच ते हवहवसं होतं. सासू-सून अशा द्विपात्री बहुअंकी नाटकाचा प्रेक्षक म्हणून आस्वाद घेणं मनोरंजक आहे, पण स्वत:वर जेव्हा त्यातली एक कुठलीही भूमिका पेलण्याची वेळ येते तेव्हा खरी कसोटी लागते. खरं तर दोन्ही भूमिका पेलण्याची वेळ जवळपास प्रत्येक स्त्रीवर येतेच, पण त्यातही सासूच्या भूमिकेचे दोन पैलू असतात म्हणजे; 'ती'ची सासू आणि 'त्या'ची सासू असे! पैकी सामान्यत: त्याची सासू अत्यंत हळवी, भित्री आणि सतत जावयाला संतुष्ट ठेवण्यासाठी जीवाचा आटापिटा करणारी असते, तर तिची सासू निर्धारी, काहीशी अहंकारी आणि सुनेला सतत पाण्यात पाहणारी असते, असा सर्वमान्य समज आहे. पण हा काही नियम नाही. मग सासू किंवा सून बनताना मन पूर्वग्रहदूषित करून आपली भूमिका ठरवून टाकण्यापेक्षा आधी एकमेकींना थोडा वेळ देऊन, पारखून मग आपल्या वागण्याचा रोख ठरवायला काय हरकत आहे?

मी सासू आहे म्हणून दुष्टच वागलं पाहिजे आणि मी सून आहे म्हणून खाष्टच वागायला हवं असं काही कुठे लिहिलेलं नाही. हो, स्त्रियांच्या आयुष्यातील विभाज्य घटक असलेल्या टीव्हीवरच्या दैनंदिन मालिकांनी मात्र स्वत:चं मीटर धावतं ठेवण्यासाठी हा नियम आपल्यावर जणू लादूनच टाकलाय.

पूर्वीच्या काळी नकळत्या कोवळ्या वयात मुलींची लग्नं व्हायची. भातुकलीच्या खेळात रमलेल्या त्या लेकींना घर-संसाराच्या रहाटगाडग्याची कल्पनाही नसायची. अशा वेळी घरातली सारी कामं, पाहुण्यांची उठबस, बाजारहाट, धुणी-भांडी असं बरंच काही या नवविवाहितांना शिकवण्याची, समजावण्याची जबाबदारी अर्थात सासूबाईंवर पडायची. मुलाचं चुकलं तर जसा मातेच्या कपाळी दोष जातो तसा सुनेचं चुकलं तरी दोष सासूलाच असे, मग सासू आपल्यावरचा दोष सुनेच्या माहेरावर लादून मोकळी होत असे. आपल्या लहान लेकरांना जितक्या सहजेपणे रागावून, ओरडून एखादी गोष्ट आई समजावत असते, तशीच पण काहीशा अधिक कठोरतेने ती सुनेला समजावली जायची. त्यात मायासुद्धा असायचीच, कारण त्यामुळेच कालांतराने सुनेने सासूला 'सासूबाई' न म्हणता 'आई' म्हणण्याची किंवा घरातली मुलं ज्या नावाने हाक मारतात त्या नावाने (मम्मी, मम्मा, माई, आक्का) हाक मारण्याची पद्धत रुजली असावी.

मला कायम या एका नात्याविषयी प्रचंड कुतूहल वाटत असायचं. अनेकींच्या अनेक कथा-कहाण्या ऐकत,अनुभवत मीही मनाची तयारी करत होते. माझ्या नव-याने पहिल्याच भेटीत मला एक गोष्ट अगदी स्पष्ट सांगितली होती, काहीही झालं तरी आई-बाबांना सोडून वेगळं राहण्याचा विषय कधीही काढायचा नाही. मी त्यावर संमतीदर्शक मान डोलावली खरी, पण पुढे काय वाढून ठेवलं आहे याचा मला तेव्हा अंदाज नव्हता. सुदैवाने माझे सासू-सासरे आणि घरातली इतर माणसंही अगदी थोडक्याच कालावधीत माझ्या जिव्हाळ्याची झाली आणि त्यांच्याशिवाय वेगळं राहण्याची कल्पनाही मनाला कधी शिवेल असं वाटत नाही. तशी वेळ कधी येऊही नये असं मनापासून वाटतं.

काही दिवसांपूर्वी ब-याच अवधीनंतर एक मैत्रीण ऑनलाइन भेटली. तिच्या लग्नाला आता जवळजवळ चार वर्षं उलटून गेली असतील. एक मुलही झालंय. माझी चौकशी करताना एकदम भावुक झाली आणि म्हणू लागली, "सासूसोबत राहणारेस? म्हणजे संसार सुखाचा अनुभव काही तुला मिळायचा नाही." मी एकदम दचकले. म्हटलं "असं का म्हणतेस? अगं, माझा नवीन संसार आहे." त्यावर ती म्हणाली, "तुझा कुठे तो तर तुझ्या सासूबाईंचा संसार आहे." पुढे स्वत:चे अनुभव सांगताना ती म्हणाली, "आमच्याकडे बघ, लग्नाला चार वर्षं होऊन गेली, पण घरातला एकही निर्णय घेण्याचं स्वातंत्र्य मला नाही. अगदी कोणती भाजी करायची हेही नाही. स्वयपाकघरातला माझा वावरही अगदी नावापुरताच असतो, कारण ते स्वयपाकघर माझसुद्धा आहे, असं मला कधी कुणी जाणवूच दिलं नाही. माझ्या आईने आवडीने मला रुखवतात दिलेल्या सगळ्या संसारोपयोगी वस्तू तशाच माळ्यावर पडून आहेत. असं वाटतं माझा स्वत:चा संसार असता तर किती हौसेने केलं असतं मी सगळं.." आणि पुढे बराच वेळ तिचं आपलं हे पुराण सुरू होतं. या संभाषणानंतर मी एकदम अंतर्मुख झाले.

खरं तर, यात पूर्णपणे सासूचा दोष नाही. काडी-काडी करून जमवलेला संसार अचानक एक दिवस नव्या स्त्रीच्या स्वाधीन करण्याचा मोठेपणा कुठल्याही स्त्रीच्या ठिकाणी असणं फार दुर्मीळ आहे. मग अशा वेळी सुनेनंच पुढाकार घेऊन, प्रसंगी संघर्ष करून आपला हक्क घरात प्रस्थापित करायला हवा. ज्या सासवांना सुनेला घरातला हक्क मुळी द्यायचाच नसेल त्यांनी निदान तिच्या संसार मार्गावर अडथळा तरी बनू नये, असं माझं प्रामाणिक मत आहे. माझ्या परिचयात अशी अनेक कुटुंब आहेत, ज्यांनी लग्नाआधीच मुलाच्या स्वतंत्र संसाराची सोय करून ठेवली होती. नाहीतर घरातल्या अतिसुरक्षित वातावरणात वाढल्याने चार टक्के-टोणपे खाऊन संसार करण्याची अक्कल कुठून यायची. फक्त मुलगा जवळ राहावा म्हणून नाइलाजाने सुनेला घरात सहन करणारी कुटुंबही मी पाहिली आहेत, पण यात तिच्या असुरक्षित मनीची आणि संसारस्वप्नांची राखरांगोळीच होत असते आणि घरातलं वातावरणही कायम दूषित होत असतं. मनाने दूर राहून एका छताखाली राहण्यापेक्षा दूर राहून मनाने जवळ राहणंच शहाणपणाचं नाही का?

याउलट सासूवर वरचढ होऊन बसणा-या अनेक सुनाही आहेतच. नवीन घरात आल्या आल्या घराचं रूप पालटून टाकण्याच्या अट्टहासाला पेटून अगदी झपाझप घरातली सगळी सत्ता काबीज करू पाहणा-या सुनांचीही काही कमी नाही.

असं असलं तरी सासू-सुना वर्षानुवर्ष सुखा-समाधानाने एकत्र संसार करत असलेलीही अनेक कुटुंबं मी अगदी जवळून पहिली आहेत. गरज असते ती थोडं मोकळं होण्याची! माझं माझं करत एखादया गोष्टीला चिकटून राहण्यापेक्षा 'आपलं' म्हणून ती वाटून घेतली की प्रश्न आपोआप सुटतात. थोडीफार कुरबुर व्हायचीच. माहेरी असताना नाही का आपले आई-वडिलांसोबत मतभेद होत?

एकत्र राहायचंय अथवा नाही याचा एकदा निर्णय घेऊन मोकळं झालं तर ब-याच गोष्टी सुटसुटीत होतात. आमचं एकत्र राहायचं आधीच ठरलंय, त्यामुळे सध्या मी आणि माझ्या सासूबाई, अशी आम्हा दोघींची एकमेकींना समजावून घेण्याची जणू कार्यशाळाच सुरू आहे. त्यांच्या वागण्या-बोलण्याचं मी खोल विश्लेषण मनातल्या मनात करत असते. त्या तसं करत नसतील कदाचित! कारण त्यांचा तो स्वभावच नाही. मी मात्र कुठल्याही छोटय़ा गोष्टीच्या वाक्याच्या खोलात शिरून, त्याचा मागमूस काढून मोकळी झालेली असते. त्या मात्र मोकळ्या मनाने प्रत्येकाशी बोलणार. घरी आलेल्या कुणालाही त्या रिकाम्या हाती जाऊ देणार नाहीत. 'दिल्याने वाढतं' असं त्यांचं ब्रीदवाक्य माझा त्यांच्याबद्दलचा आदर आणखी वाढवतं. कधी त्यांचे विचार मला अगदी जुनाट वाटतात तर कधी त्या असं काहीतरी बोलून जातात की वाटतं एवढे आधुनिक विचार तर आपणही करत नाही. नुसते विचारच नाही तर कृतीतूनही त्या वेळोवेळी त्यांच्या मनाचा आधुनिकपणा दाखवून देतात.

त्यांच्या रूपात मला एक सहवाचकही सापडलाय. माझ्या व्यतिरिक्त घरात कुणीतरी माझी पुस्तकं आवडीने बघतं आणि सवडीने वाचतं हे पाहून मला आनंदच होतो. माझ्या कुठल्याही लेखाचं वाचन त्या अगदी आवर्जून करतात. माझं कुठल्याही बाबतीत कौतुक करत असताना हातचं राखून बोलताना मी त्यांना कधी पाहिलेलं नाही. जे काही करणार ते अगदी मनापासून! स्वयंपाकघराबाबत मात्र त्या थोडय़ा आग्रही आहेत, पण मीसुद्धा मध्ये लुडबुड करून आपली संधी मिळवतेच! मी केलेल्या पदार्थाचंही त्या तितक्याच प्रामाणिकपणे परीक्षण करतात आणि मोकळेपणे प्रतिक्रियाही देतात. सुनेशी कसं वागायचंय हे त्यांना आणि सासूशी कसं वागायचं नाही हे मला पक्कं ठाऊक आहे. त्यामुळे आमच्यातल्या संभाषणात आणि वागण्यात सहजता दिसून येते.

हे सगळं इथे लिहिण्यामागे माझ्या सासूबाईंवर स्तुतिसुमनं उधळून त्यांच्याकडून कौतुक करून घेण्याचा माझा उद्देश नाही तर थोडासा समजूतदारपणा आणि संवादकौशल्य आपल्या आयुष्यातल्या अनेक गोष्टी सोप्या करू शकतं, हे सांगण्याचा आहे. माहेरी असते ती 'आई' आणि सासरी असते ती 'सासू' हा जुनाट आणि बिनबुडाचा समज आता नाहीसा व्हायला हवा. एकाच जन्मात आपल्याला दोन आईंची माया मिळणं भाग्याचंच मानलं पाहिजे. त्याचप्रमाणे घरात मुलगी असेल तर तिला बहीण म्हणून आपली सून घरात आली आहे आणि नसेल तर मुलगीच बनून घरात आली आहे, असा सकारात्मक विचार जर सासवांनी केला तर त्या टीव्ही मालिकावाल्यांच्या तोंडात मारून दोघींनाही सुखाने संसार करणं नक्की शक्य होईल.

तृप्ती एकबोटे-देवरूखकर

trupti.ekbote@gmail.com

(प्रहार दैनिकात १३ फेब्रुवारी २०१४ रोजी प्रकाशित)

# मी मराठी बोलतेय!

सौ. शैला प्रसाद किर्लोस्कर

नमस्कार सभ्य स्त्री–पुरुष जन हो, रसिक प्रेक्षक, रसिक श्रोते हो, नमस्कार! तुमच्या या स्नेहसंमेलनात, मी मध्येच आले त्याबद्दल प्रथम सर्वांची क्षमा मागते. पण काय करणार मी इथुन जात होते आणि माझ्या संदर्भातील काही गोष्टी माझ्या कानांवर पडल्या, म्हणून मला राहवेना. मी तशीच आत आले, काहीतरी 1मे महाराष्ट्र दिन असे कानांवर पडले, माझा जयजयकार ऐकू आला म्हणून उत्सुकतेपोटी मी इथे आले आणि मी पाहिले की इथे काहीतरी मराठी दिवसाचा, महाराष्ट्र दिनाचा कार्यक्रम चालू आहे. सर्व मराठी भाषिक एकत्र येऊन काहीतरी कार्यक्रम तो ही मराठीतून करताहेत हे पाहून तर मला राहवेचना. तुमच्या या कार्यक्रमात तुमच्या संमतीने थोडे माझे विचार सांगावेत म्हणून मी इथे आले. अरे हो, समस्त श्रोतृवर्गाच्या चेहेऱ्यावरचे भले थोरले प्रश्नचिन्ह मला दिसते आहे की कोण या बाई आणि आमच्या कार्यक्रमात मध्येच येऊन ही काय बडबड यांनी लावली आहे? तर श्रोते हो तुम्ही मला ओळखले नाही का? अहो मी तुमचीच, जवळची, अगदी रोजच्या आयुष्यात तुम्हाला जिची सारखी मदत घ्यावी लागते ती मी. नाही ओळखलंत? अहो, मी मराठी! मराठी भाषा. आले का लक्षात? पण छे. कोणालाच मी कोण ते लक्षात येत नाही कारण आज माझी अवस्था अतिशय वाईट, अत्यंत दयनीय अशी झाली आहे. ৳

माझी मराठी मुलेच मला स्वीकारायला तयार नाहीत. ती आज मला माझी, माय, माझी आई अशी साद घालायला तयार नाहीत. कारण आज माझ्यातले आई–बाबा आता मम्मी–पप्पा झाले आहेत. माझी लहान लेकरं लव्हली किड्स् झाली आहेत. मायेचे आजी–आजोबा ग्रॅण्ड–मा, ग्रॅण्ड पा झाले आहेत. माझ्या आईला आता मी शोधू तरी कुठे? माझ्या बाबांना मी आता कशी ओळखू?

कारण.....कारण ते आता झालेत मम्मी–पप्पा!

जी गत माझ्या लेकरांची तीच गत माझ्या शाळेचीही. माझ्या शाळा ओस पडू लागल्या आहेत. माझ्या मराठी शाळेला विद्यार्थी मिळत नाहीत. सर्वांना इंग्रजी शाळेचे आकर्षण आहे. आंग्ल भाषेचे आकर्षण आहे. त्यांचा पेहराव, त्यांच्या चालीरीती, त्यांचे खाद्यपदार्थ लोकांनी आपलेसे केले आहेत. शिरा, उपमा, पोहे हे मराठमोळे पदार्थ मुलांना नकोसे वाटतात. त्याऐवजी पिझ्झा, बर्गर हे आणि असेच पदार्थ त्यांना जवळचे वाटताहेत. मुलांच्या वाढदिवशी दिवा उजळून त्यांचे औक्षण करण्याची, त्यांचे दिर्घायुष्य चिंतण्याची आपली भारतीय परंपरा. ती जाउन आता त्याऐवजी घरोघरी मेणबत्त्या विझवून केक कापला जातोय. यापेक्षा दुर्दैव ते काय असू शकते?

पण खरं सांगू का? मी अशी नव्हते हो! अत्यंत तेजस्वी असं माझं रुप होतं.साहित्य, कला यांनी मी समृध्द होते. राजदरबारी मला मानाचे स्थान होते. माझी लेकरंही अशी नव्हती. एकेकाळी त्यांचं खरंच माझ्यावर खूप प्रेम होतं. माझा रुबाब होता. शिवाजी सारख्या लेकराने मला राजदरबारी मानाचे स्थान दिले होते. माझ्या आघाताने टिळकांनी इंग्रज सरकारला ठणकावले होते. सरकारचे डोके ठिकाणावर आहे काय? असा त्यांनी प्रश्न विचारला होता. तो आजही विचारण्याची गरज निर्माण झाली आहे. पण या सगळ्याला गोऱ्या साहेबाची नजर लागली. दिडशे वर्षे राज्य करुन साहेब गेला खरा पण इथे या भारतात, माझ्या या मातीत काळे इंग्रज सोडून गेला. त्याचीच ही सारी करणी. आता तर सरकारदरबारी सुध्दा कोणी मला विचारत नाही. अतिशय वाईट असे दिवस मी बघतेय. पण त्यातही मला आशा आहे की माझीच काही लेकरं अशी आपल्या आईचा अपमान आता यापुढे सहन करणार नाहीत. ते तिला मानाने जगवतील, समाजात मानाने वागवतील. आई अशी अभिमानाने हाक मारतील. आणि तिला तिचे पूर्वीचे वैभव परत मिळवून देतील. माझी माझ्या सर्व मुलांना ही कळकळीची विनंती आहे रे की मला जगवा, आपल्या आईला जगवा.